श्री. दादू रामचंद्र शेजवळ व कै . संजय नारायण खडंग यांना न्या.कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः काव्यआ-६६१४/प्र.क्र.२५८/आस्था-१०
बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई-४०० ०३२,
तारीख: १७ सप्टेंबर, २०१८

वाचा §

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल,२००१.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद सातारा यांचे दिनांक १६/०१/२०१८ चा प्रस्ताव.

प्रस्तावना:- रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना न्या. कालेलकर करारानुसार पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने धोरणात्मक निर्णय घेतला असून, जे कर्मचारी सार्वजनिक बांधकाम विभाग, दि.२४.४.२००१ च्या शासन निर्णयामधील अटींची पूर्तता करतील त्यांना न्या.कालेलकर करारानुसार फायदे देण्यासाठी रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि. २४.४.२००१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अट क्र.१ नुसार रोजंदारी / कार्यव्ययी आस्थापनेवरील जे कर्मचारी शासन सेवेत /जिल्हा परिषद सेवेत कार्यरत आहेत आणि त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून त्यांच्या सलग सेवेस उशीरात उशीरा दि.३१.१२.१९९८ रोजी ५ वर्षे व प्रत्येक वर्षी कामाचे २४० दिवस पुर्ण झालेली आहेत आणि करारातील अटींची पूर्तता करतील अशा कर्मचाऱ्यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. तसेच अट क्र. २ नुसार रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना त्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यामुळे शासकीय सेवेतून कमी करण्यात आले होते. तथापि, ज्या कर्मचाऱ्यांनी अशा कपातीविरुध्द न्यायालयात दावे दाखल केलेले आहेत, अशा कर्मचाऱ्यांपैकी ज्यांना न्यायालयाच्या निर्णयानुसार पुन:स्थापित करण्यात आलेले आहे. अशा कर्मचाऱ्यांना पूर्वलक्षी प्रभावाने रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरविले आहे. याचबरोबर परिच्छेद क्र.२ नुसार ज्या कर्मचाऱ्यांनी न्यायालयात दावे/रिव्हीजन/अपिल/अवमान याचिका

दाखल केलेली आहे, अशा सर्व कर्मचाऱ्यांनी सर्व प्रकारचे दावे विनाअट मागे घेतल्यानंतर त्यांना रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

२. न्या. कालेलकर करार मागणी-१ रोजंदारी आस्थापना परिच्छेद-२८ मध्ये नियमित आस्थापनेवर नेमणूक मिळण्याबाबत खालील तरतूद आहे.

"रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर कामगार नेमला गेला की, त्याला मुंबई मुलकी सेवा नियम लागू होतात."

३. श्री. दादू रामचंद्र शेजवळ यांची दिनांक २१/०२/१९८७ रोजी व कै. संजय नारायण खडंग यांची रोजंदारी कमर्चारी म्हणून दिनांक २२/४/१९८८ रोजी जिल्हा परिषद, सातारा यांच्याकडून नेमणूक करण्यात आली होती.

४. जिल्हा परिषद, सातारा अंतर्गत रोजंदारीवरील श्री. दादू रामचंद्र शेजवळ व कै. संजय नारायण खडंग हे मा. कामगार न्यायालय व मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार रुपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास पात्र ठरत असल्याची शिफारस मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद , सातारा यांनी केलेली आहे .

## शासन निर्णय

रोजंदारी /कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१मधील तरतूदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या परिशिष्ट- "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांचे प्रस्तावातील श्री. दादू रामचंद्र शेजवळ व कै. संजय नारायण खडंग यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार या निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-"अ" मधील रोजंदारी कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकाना क्र.६ मधील पदावर व रकाना क्र.७ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर घेण्यास शासन मान्यता देत आहे:-

२. शासनाच्या या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर आणल्यानंतर त्यांना न्या.कालेलकर कराराच्या तरतूदीनुसार अनुज्ञेय ठरणाऱ्या वेतनवाढीतील फरकाचे विनियमन पुढील प्रमाणे करण्यात येईल:-

- परिशिष्ट-"अ" मध्ये नमूद कर्मचा-यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून दि.३१/०४/२०१८ पर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकरच्या भत्त्यासहित) सन - २०१८-२०१९या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या ऑक्टोबर महिन्यांत संबंधित कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीत( त्यांच्या सेवानिवृत्तीला

शिल्लक कालावधी विचारात घेऊन जास्तीतजास्त दहा (१०) समान हप्त्यात जमा करण्यात यावी ) व प्रत्येक हप्ता त्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा झाल्यापासून ३ वर्षापर्यंत सदर रक्कम त्यांना खात्यातून काढता येणार नाही . ३१/०४/२०१८ पासून पुढील वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) संबंधित कर्मचा-यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

- उपरोक्त कर्मचारी जर सेवानिवृत्त झाले असतील, अशा कर्मचाऱ्यांना रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेवर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या वेतन वाढीतील फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहित) त्यांना अनुज्ञेय होणारी थकबाकीची संपूर्ण रक्कम ही त्यांच्या नांवे काढलेल्या धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.

३. वर नमूद केलेल्या थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही आणि संबंधित कर्मचाऱ्यांकडून अथवा दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसाकडून भविष्यात व्याजाबाबतची मागणी करण्यांत येणार नाही, अशाप्रकाराचे प्रतिज्ञापत्र त्यांनी जिल्हा परिषदेला सादर करणे बंधनकारक राहील.

४. संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयान्वये कर्मचाऱ्याला चालू आर्थिक वर्षात अदा करावा लागणारा खर्च मंजूर अनुदानातून करावयाचा आहे.

५. रुपांतरित नियमित अस्थायी आस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, सदर आदेश श्री. दादू रामचंद्र शेजवळ व कै. संजय नारायण खडंग यांना मान्य नसल्यास त्यांनी त्याबद्दलचे लेखी प्रतिवेदन त्याला व्यक्तीनिहाय आदेश मिळाल्यापासून तीन महिन्यात सादर करणे आवश्यक आहे. या मुदतीत कोणतेही प्रतिवेदन प्राप्त न झाल्यास त्यांचे काढलेले आदेश अंतिम समजण्यात येतील व त्यानंतर त्यांची कोणतीही तक्रार विचारात घेतली जाणार नाही.

६. अस्थायी आस्थापनेवर रुपांतरित झालेले पद संबंधित पदधारक ज्या दिनांकापर्यंत सेवेत असतील त्या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यात येत आहे.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.रुअआ-१५९६/२२८/सेवा-५, दि.२४ एप्रिल, २००१ अन्वये दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१७१११२२३२२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Girish Dinkar Bhalerao

Digitally signed by Girish Dinkar Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca8fd093b771c4573a3a57cff525280d3134f0f7af228e47d44bd71716c64fc3, cn=Girish Dinkar Bhalerao
Date: 2018.09.21 13:07:30 +05'30'

गिरीश भालेराव
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२,नागपूर,
२. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
३. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
४. विभागीय आयुक्त,विभागीय आयुक्त कार्यालय,पुणे विभाग,पुणे.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
६. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७. मा.राज्यमंत्री, (ग्रा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
९. वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
१०.निवड नस्ती, कार्यासन आस्था.१०,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

परिशिष्ट-"अ"

शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्र.काव्यआ-६६१४/प्र.क्र.२५८/आस्था-१०,

दिनांक- १७ सप्टेंबर,२०१८ चे सहपत्र.

| अ. क्र. | कर्मचा-याचे नाव | आस्थापनेचा प्रकार | नेमणूकीचे पद | विभागाचे नाव | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाच्या पदाचे नाव | ज्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचा आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. दादू रामचंद्र शेजवळ | रोजंदारी | मजूर | जि. प. सातारा | मजूर | २१/०२/१९९२ |
| २ | कै.संजय नारायण खडंग | रोजंदारी | मजूर | जि. प. सातारा | मजूर | २२/०४/१९९३ |

Girish Dinkar Bhalerao

Digitally signed by Girish Dinkar Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca8fd093b771c4573a3a57cff525280d3134f0f7af228e47d44bd71716c64fc3, cn=Girish Dinkar Bhalerao
Date: 2018.09.21 13:07:58 +05'30'

(गिरीश भालेराव)

उप सचिव, महाराष्ट्र शासन.